महिला व बाल विकासाच्या योजना राबविण्याकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूद वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीजीटी २०२१/ प्र.क्र.२२८/का-२**
नवीन प्रशासकीय इमारत, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २६ नोव्हेंबर,२०२१.

वाचा :- वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर,२०२१.

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत महिला व बालकांच्या विकासाकरीता राबविण्यात येत असलेल्या विविध विकास योजनांकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीत करण्यात आलेली तरतूद वित्त विभागाच्या निदेर्शानुसार वितरीत करण्याची बाब विचाराधीन होती. यानुषंगाने वित्त विभागाने सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील माहे डिसेंबर,२०२१ पर्यंतच्या खर्चाकरीता ३१ सहायक अनुदान वेतनेतर याखाली उपरोक्त वाचा मधील संदर्भीत शासन निर्णय दिनांक १४ ऑक्टोबर,२०२१ अन्वये विभागाला उपलब्ध करुन दिलेला निधी वितरीत करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

या कार्यासनांतर्गत असणाऱ्या विषयाच्या अनुषंगाने आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेमार्फत राज्यातील महिला व बाल विकासासंदर्भात राबविण्यात येत असलेल्या विविध योजनांकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीपैकी खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेली तरतूद वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रुपये हजार)

| अ.क्र. | लेखाशिर्ष | सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीत केलेली तरतूद | वितरण व खर्च करण्यास मंजूरी देण्यात आलेला निधी |
|---|---|---|---|
| १. | आधारगृह चालविण्यासाठी स्वयंसेवी संस्थांना सहाय्य २२३५ १२८१ ३१ सहायक अनुदान वेतनेतर | २७३६.०० | १३६८.०० |

| | | | |
|---|---|---|---|
| २. | महिला मंडळांना अनुदाने<br>२२३५ २१३४<br>३१ सहायक अनुदान वेतनेतर | ४१७१.०० | २०८५.०० |
| ३. | हुंडा पध्दतीचे निर्मुलन<br>२२३५ १३८१<br>३१ सहायक अनुदान वेतनेतर | १६२०.०० | ८१०.०० |
| ४. | देवीदासीचे पुनर्वसन<br>२२३५ १८५३<br>३१ सहायक अनुदान वेतनेतर | १९१२.०० | ९५६.०० |

उपरोक्त विवरणपत्रातील वितरण व खर्च करण्यास मंजूरी देण्यात आलेला निधी हा संबंधीत बाबीवर निधी खर्च करताना आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी खालीलप्रमाणे दक्षता घ्यावी.

१. निधी वितरणासंदर्भात वित्त विभागाने निर्गमीत केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकाराचे प्रत्यायोजन यांचे काटेकोर पालन करावे.
२. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील योजनांवरील खर्चाकरीता अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला निधी हा माहे मार्च,२०२२ अखेर खर्च करणे व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित वेळेत शासनास सादर करण्याची जबाबदारी आयुक्त,महिला व बाल विकास, पुणे यांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर शासन निर्णयाकरीता संकेतांक क्रमांक २०२१११२६१६२३५४१५३० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sharad Laxman Ahire

Digitally signed by Sharad Laxman Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b9bd688b9963b30401eb5b16e2839c534797f7c0241ad6e715d237585caf58e7, serialNumber=cbebc5baaa1e92d127127b9ea6c25d4909188956d5d79d31ff8978b7bfd8fc57, cn=Sharad Laxman Ahire
Date: 2021.11.26 16:25:56 +05'30'

**( श.ल.अहिरे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.मंत्री / मा.राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
२. मा.अध्यक्ष /उपाध्यक्ष (विधानसभा) विधानमंडळ, मुंबई.
३. मा.सभापती /उपसभापती (विधानपरिषद),विधानमंडळ, मुंबई.
४. प्रधान सचिव,महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई-३२.
५. आयुक्त, महिला व बाल विकास, म.रा.पुणे.

६. उप आयुक्त, (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, म.रा.पुणे.
७. महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता ) /(लेखा परिक्षा),मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई शहर/मुंबई उपनगर
९. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१०.जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (सर्व)
११.वित्त विभाग (व्यय -६) (अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१२.सह सचिव /उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१३.कक्ष अधिकारी(का-४) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१४.निवड नस्ती (का-२), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.